नवनिर्मित वाशिम, नंदुरबार, हिंगोली, गोंदीया या ४ जिल्हयासाठी होमगार्ड कार्यालये सुरु करणे व ४४ पदे निर्मिती करणे

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग (विशेष)**
शासन निर्णय क्र.एचजीएस-२००९/प्र.क्र.२७४ /विशा-८
मंत्रालय, मुंबई-४०००३२, दिनांक: ८ जानेवारी, ,२०१०

पहा:- १) शासन निर्णय क्रमांक एचजीएस ५३५९- VI, दिनांक २२.५.१९५९
२) शासन निर्णय क्रमांक एचजीएस ०५८०/१२१७/विशा-७ दिनांक २६.११.१९८०
३) महासमादेशक, होमगार्ड महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.मस/प्रशा/१/९९/२४१ दि.२३.४.९९
४) महासमादेशक, होमगार्ड महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.मस/कार्या-३/०९/३१३४ दि.१.१०.२००९

<u>प्रस्तावाना</u>:- नैसर्गिक / मानव निर्मित आपत्तीच्या प्रसंगी सहाय्य करणे, पोलीसांना कायदा व सुवस्था राखण्यासाठी बंदोबस्ताकामी सहाय्य करणे, संपकाळात अत्यावश्यक सेवा सुरु होण्यास सहाय्य करणे ही होमगार्ड संघटनेची कर्तव्ये आहेत. होमगार्ड संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई, यांच्या अधिपत्याखाली राज्यात अस्तित्वात असलेल्या जिल्हयामध्ये (१) जिल्हा समादेशक होमगार्ड कार्यालय, व (२) जिल्हा प्रशिक्षण केंद्र, अशी २ कार्यालय कार्यरत असून संदर कार्यालयात केवळ गट-क व ड संवर्गातील पदे मंजूर आहेत. होमगार्ड संघटनेच्या पदांच्या आढाव्याअंती, शासन निर्णय दि.१८.११.२००३ अन्वये ६४० पदांच्या आकृतीबंधाचे आदेश निर्गमित करण्यात आले आहेत.

२. महाराष्ट्र राज्यात दिनांक १.७.१९९८ पासून वाशिम / नंदुरबार, व दि.१.५.१९९९ पासून हिंगोली / गोंदिया हे जिल्हे नव्याने निर्माण करण्यात आलेले आहेत. महाराष्ट्र राज्यात होमगार्ड संघटना सक्षम व बळकट करण्यासाठी या नवनिर्मित जिल्हयात कार्यालये स्थापन करण्याच्या अनुषंगाने आवश्यक असणारी पदे निर्माण करण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u>:-** वाशिम, गोदीया, नंदूरबार व हिंगोली या ४ नवनिर्मित जिल्हयात या शासन निर्णयान्वये खालील विवरणपत्रात नमुद केल्यानुसार एकूण ४४ अस्थायी पदे निर्माण करण्यास शासन मंजुरी देण्यात येत आहे. सदर अस्थायी पदे प्रस्तुत शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून अस्तित्वात येतील व जानेवारी २०११ पर्यंत पुढे सुरु राहतील.

**१) <u>जिल्हा समादेशक होमगार्ड कार्यालय</u> :-**

| अ.क्र. | पदनाम | पदसंख्या | वेतन श्रेणी | |
|---|---|---|---|---|
| | | | वेतन बॅन्ड | ग्रेड वेतन |
| १ | प्रशासकिय अधिकारी | ४ | ९३००-३४८०० | ४,३०० |
| २ | प्रमुख लिपिक | ४ | ५२००-२०२०० | २,४०० |
| ३ | कनिष्ठ लिपिक | ४ | ५२००-२०२०० | १,९०० |
| ४ | वाहन चालक | ४ | ५२००-२०२०० | १,९०० |
| ५ | शिपाई | ४ | ४४४०-७४४० | १,३०० |
| | एकूण | २० | | |

**२) <u>जिल्हा प्रशिक्षण केंद्र</u>:-**

| अ.क्र. | पदनाम | पदसंख्या | वेतन श्रेणी | |
|---|---|---|---|---|
| | | | वेतन बॅन्ड | ग्रेड वेतन |
| १ | केंद्र नायक | ४ | ९३००-३४८०० | ४,३०० |
| २ | फलटण नायक | ४ | ९३००-३४८०० | ४,२०० |
| ३ | हवालदार निदेशक | ८ | ९३००-३४८०० | ४,२०० |
| ४ | हवालदार लिपिक | ४ | ५२००-२०२०० | १,९०० |
| ५ | शिपाई | ४ | ४४४०-७४४० | १,३०० |
| | एकूण | २४ | | |

२. या शासन निर्णयान्वये ***जिल्हा समादेशक होमगार्ड*** या मानसेवी पदावरील अधिकाऱ्यास संबधित कार्यालयाचे ***कार्यालय प्रमुख*** व तसेच ***प्रशासिक अधिकारी गट-क*** यांना ***आहरण व संवितरण अधिकारी*** म्हणून कर्तव्ये पार पाडण्यास शासन मंजूरी देत आहे.

३. नवनिर्मित जिल्हयापैकी हिंगोली व नंदुरबार या जिल्हयातील प्रशासिक अधिकारी गट-क या पदावर बदलीने पदस्थापना देण्याच्या संदर्भात शासन

आदेश निर्गमित करण्यात येत आहेत. त्यास अनुसरुन महासमादेशक होमगार्ड महाराष्ट्र राज्य मुंबई यांनी संबधित कर्मचाऱ्याच्या पदस्थापनेबाबतचे आदेश निर्गमित करुन इतर पदे विहित मार्गाने भरण्यासंदर्भातील कार्यवाही तातडीने करावी.

४. नव्याने निर्माण केलेल्या उक्त पदांच्या फेब्रूवारी २०१० ते मार्च २०१० या २ महिन्याच्या कालावधीतील वेतन व भत्यावरील होणाऱ्या खर्चासाठी "*२०७०- इतर प्रशासनिक सेवा-१०७ होमगार्ड-(०१)- वेतन*" या लेखाशिर्षाखाली डिसेंबर २००९ मध्ये पुरवणी मागणी बाब क्र २७ द्वारे रु.१३,०१,१२८/ ( रुपये तेरा लाख एक हजार एकशे अठ्ठावीस फक्त ) करण्यात आलेल्या तरतूदीतून भागविण्यास प्रशासकिय मान्यता देण्यात येत आहे.

५. महासमादेशक, होमगार्ड, यांनी नवनिर्मित जिल्हयात ***जिल्हा समादेशक, होमगार्ड,*** हे मानसेवी पद भरण्यासाठी विहित प्रक्रिया राबविण्याची कार्यवाही तातडीने सुरु करुन सदर कार्यवाही अंतीम टप्यात आल्यानंतर वाहन खरेदीच्या अनुषंगाने शासनास प्रस्ताव सादर करावा.

६. हे आदेश नवनिर्मित व विभाजना पुर्वीच्या जिल्हयातील प्रमुख वृत्त पत्राद्वारे प्रसिध्द करुन होमगार्ड संघटनेत स्वयंसेवकांची भरती प्रक्रिया सुरु करण्याची तात्काळ कार्यवाही करावी.

७. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.३७१/०९/व्यय-८ दि.७.११.०९ अन्वये त्या विभागाच्या संमतीने निर्गमित करण्यात येत आहेत.

८. हा शासन निर्णय राज्य शासनाच्या वेब साईटवर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०१००१०८१८२७१३००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(रा.गो.गायकवाड )
कार्यासन अधिकारी, गृह विभाग (विशेष),
महाराष्ट्र शासन.

प्रति,

मा.मंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव.
मा.राज्यमंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव.
अ.मु.स. (गृह) यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक.
प्रधान सचिव, (विशेष) गृह यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक.
महासंचालक नागरी सरक्षण (होमगार्ड) केंद्र शासन नवी दिल्ली.
महासमादेशक, होमगार्ड व संचालक, नागरी संरक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
जिल्हा दंडाधिकरी वाशिम, नंदूरबार, हिगोंली, गोंदीया
महासंचालक, माहिती व जनसंपर्क विभाग,मंत्रालय,(प्रसिध्दीसाठी).
जिल्हा पोलीस अधिक्षक वाशिम, नंदूरबार, हिगोंली, गोंदीया.
अप्पर पोलीस अधिक्षक वाशिम, नंदूरबार, हिगोंली, गोंदीया.
जिल्हा जनसंपर्क अधिकारी (प्रसिध्दीसाठी) वाशिम, नंदूरबार, हिगोंली, गोंदीया.
समादेशक, होमगार्ड, मुंबई, बृहन्मुंबई.
सर्व जिल्हा समादेशक, होमगार्ड.
समादेशक, मध्यवर्ती प्रशिक्षण संस्था, होमगार्ड, घाटकोपर, मुंबई.
महालेखापाल, (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
महालेखापाल, (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
जिल्हा कोषागार अधिकारी वाशिम, नंदूरबार, हिगोंली, गोंदीया.
वित्त विभाग, व्यय-८, मंत्रालय, मुंबई.
संगणक कक्ष , गृह विभाग, मंत्रालय.शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्याबाबत कार्यवाहीसाठी अग्रेषित.
निवड नस्ती विशा-८.